**फोर्थ वर्ल्ड काँग्रेस ऑन डिझास्टर मॅनेजमेंट च्या आर्थिक व्यवहारासाठी राष्ट्रीयीकृत बँकेत नवीन खाते उघडणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग ( मदत व पुनर्वसन )**

**शासन निर्णय क्रमांक :- २०१८/प्र.क्र.२० (अ)/आव्यप्र-१**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- ३१ ऑगस्ट, २०१८.

**प्रस्तावना :-**

आपत्ती व्यवस्थापन या विषयावरील फोर्थ वर्ल्ड काँग्रेस ऑन डिझास्टर मॅनेजमेंट चे आयोजन करण्यास राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाने मान्यता दिली आहे. या काँगेसचे आयोजन दिनांक २९ जानेवारी ते १ फेब्रुवारी २०१९ या कालावधीत करण्यात येणार आहे. सदर काँग्रेसचे सह आयोजक डी.एम.आय.सी.एस. हैद्राबाद, इंडीयन इन्स्टि्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, मुंबई आणि टाटा सामाजिक विज्ञान संस्थान, मुंबई आहेत. आपत्ती व्यवस्थापन क्षेत्रातील आंतरराष्ट्रीय तज्ञ मंडळी या फोर्थ वर्ल्ड काँग्रेस ऑन डिझास्टर मॅनेजमेंट मध्ये सहभागी होणार आहेत.

आपत्ती व्यवस्थापन या विषयावरील फोर्थ वर्ल्ड काँग्रेस ऑन डिझास्टर मॅनेजमेंट चे आर्थिक व्यवहार करण्यासाठी राष्ट्रीयीकृत बँकेत नवीन खाते उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आपत्ती व्यवस्थापन प्रभागामार्फत डी.एम.आय.सी.एस. हैद्राबाद, इंडियन इन्सिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, मुंबई आणि टाटा सामाजिक विज्ञान संस्थान, मुंबई यांच्या सहकार्याने फोर्थ वर्ल्ड काँग्रेस ऑन डिझास्टर मॅनेजमेंट चे आयोजन करण्यास आणि त्यासाठी स्टेट बँक ऑफ इंडियामध्ये नवीन बचत खाते उघडण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर बँक खात्यातील जमा व खर्चाचे व्यवस्थापन परिषद आयोजनासाठी नेमण्यात येणाऱ्या स्वतंत्र वित्तीय समिती मार्फत करण्यात येईल.

स्टेट बँक ऑफ इंडिया मध्ये उघडण्यात आलेल्या सदर बँक खात्याचा वापर केवळ फोर्थ वर्ल्ड काँग्रेस ऑन डिझास्टर मॅनेजमेंटसाठी महाराष्ट्र शासनाकडून देण्यात येणारा निधी, परिषदेत सहभागी प्रतिनिधी यांचेकडून घ्यावयाचे नोंदणी शुल्क, परिषदेदरम्यान आयोजित करावायाच्या प्रदर्शनासाठी जागा वापर शुल्क, विविध प्रायोजकांकडून परिषदेसाठी प्राप्त होणारा निधी व जाहिरातीव्दारे प्राप्त निधी जमा करण्याकरीताच करण्यात यावा.

फोर्थ वर्ल्ड काँग्रेस ऑन डिझास्टर मॅनेजमेंटचे आयोजनासाठी होणारा खर्च यासाठी नेमण्यात येणाऱ्या वित्तीय समितीचे मान्यतेने सदर बँक खात्यातून करण्यात यावा.

परिषद आयोजनासाठी नेमण्यात येणाऱ्या वित्तीय समितीने सदर बँक खात्यातील व्यवहारांचे मासिक/ तिमाही ताळमेळ करणे त्याचे लेखापरीक्षण करणे आवश्यक राहील.

सदर बँक खाते केवळ फोर्थ वर्ल्ड काँग्रेस ऑन डिझास्टर मॅनेजमेंट परिषदेपुरतेच मर्यादित राहील. दिनांक ३१ मार्च, २०१९ नंतर सदर बँक खाते बंद करण्यात यावे.

सदर बँक खाते बंद करण्यात आल्यानंतर त्या खात्यातील शिल्लक रकमेचा ताळमेळ घेवून शिल्लक अखर्चित रक्कम योग्य त्या शासन लेखाशीर्षाखाली जमा करण्यात यावी.

सदर आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३२२/ १८/कोप्र-५, दि. २१.०८.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्र २०१८०८३११२१६४३९६१९ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrirang
Shripati Gholap

Digitally signed by Shrirang Shripati Gholap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DMU/R AND R, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e1b6e289fe7dcde27c972916398d8220a134ed8ebf6439e54d1927c5c4b28bec, cn=Shrirang Shripati Gholap
Date: 2018.08.31 12:18:22 +05'30'

**(श्रीरंग घोलप)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे अपर मुख्य सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव (सर्व)
४. मा. मंत्री (म. व पु.) यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री (म. व पु.) यांचे खाजगी सचिव
६. इंडियन इन्सिट्युट ऑफ टेक्नोलॉजी, मुंबई
७. टाटा सामाजिक विज्ञान संस्थान, मुंबई
८. DMICS, हैद्राबाद
९. अपर मुख्य सचिव (म. व पु.) यांचे स्वीय सहायक
१०. संचालक (आव्यप्र) यांचे स्वीय सहायक/ आपत्ती व्यवस्थापन प्रभागातील सर्व कार्यासने